


# जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर

# ता.मालेगाव जि.नाशिक





## || समर्पण ||

अदयापही शाळेच्या प्रांगणात

न उमलू शकलेल्या

रानामाथ्यावरील

वंचित

रानफुलांना .....

# मनोगत

## “प्रेरणा घ्या,प्रेरणा दया”

प्रगत शैक्षणिक महाराष्ट्रात आणि बदलणाऱ्या शैक्षणिक तंत्रस्नेही जगात जिल्हा परिषद शाळा बदलत आहेत,हे सत्य स्वीकारावेच लागेल.प्रेरणादायी अधिकारी,जागृत समाज नि शाळेशी संबंधित प्रत्येक घटक एकत्र येत गेल्याने खूप क्रांतिकारी बदल घडलाय.बदलत्या तंत्रस्नेही डिजिटल युगाचा नि ज्ञानरचनावादाचा पुरस्कार करीत जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर वाटचाल करीत आहे.

बदलत्या संकल्पनांचा आधार घेत ज्ञानरचनावाद व तंत्रज्ञानाची योग्य सांगड घालीत आज विद्यार्थ्यांचा ‘कविता रानफुलांच्या” हा डिजिटल PDF स्वरूपातील काव्यसंग्रह आपल्यापर्यंत पोहोचविण्याचा आनंद आहे.विदयार्थी उपयुक्त अनेक रचनावादी व तंत्रस्नेही उपक्रम शाळा राबवित असते.विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावा व त्यांच्या अभिव्यक्तीला व्यासपीठ मिळावे,त्यांना मार्गदर्शन व्हावे हा लहानसा उद्देश ठेऊनच हा प्रयत्न ...यमक जुळवितांना नि त्याचं भावविश्व लक्षात घेता निवडक बदल वगळता काव्यसंग्रह जशाचा तसा .....

भाषिक रचनावादाचा उपयोग करीत स्वतःच्या भावविश्वातील कवितांना प्रत्यक्षात आधी मनात,नंतर कागदावर रेखाटत प्रकट व्हायला संधी विदयार्थ्यांना देण्यात आली.आवडीचं शिक्षण ...इ.१ ली ते ४ थी पर्यंतच्या विद्यार्थ्यांनी स्वतःचे भाव व्यक्त करत कविता लिहिल्या.त्यांना एक वेगळे व्यासपीठ असावे हा मनोदय मनात होताच.हस्तलिखित तर आहेच पण तंत्रज्ञानाचा उपयोग करीत डिजिटल लायब्ररी या

संकल्पनेतूनच डिजिटल कवितेचा जन्म झाला तेही विद्यार्थ्यांच्या दूरदृष्टीतून....आपण फक्त निमित्तमात्र...सर्वप्रथम “कविता रानफुलांच्या” हा कविता संग्रह प्रकाशित होण्याचा मनोदय व स्वप्न बाळगणाऱ्या माझ्या सर्व विद्यार्थ्यांचे यावेळी ऋण व्यक्त करतो.

आमच्या शाळेचा खरा आधारस्तंभ नि प्रेरणादायक व्यक्तिमत्व म्हणजे आमचे मुख्याध्यापक श्री.आर.बी.बधान सर यांची प्रेरणा यामागे होतीच.कविता डिजिटल PDF स्वरुपात प्रत्यक्ष,WHATSAPP,HIKE,BLOG FB व इतर मार्गांनीही वाचनप्रेमीपर्यंत पोहोचविण्याचा मानस आहेच पण ई साहित्य प्रतिष्ठानने आपल्या www.esahity.com या वेबसाईटवर माझ्या चिमुरड्यांना जे व्यासपीठ उपलब्ध करून दिले,त्या संपूर्ण टीमचाही मी ऋणी आहे.

दोस्तहो,या काव्यसंग्रहास प्रत्येक रानपाखराच्या कवितेच्या भावाला समजून घेत दीर्घ प्रस्तावना देत दाद देणारे लेखक तथा कवी परममित्र संतोष कांबळे यांचेही मी याप्रसंगी ऋण व्यक्त करतो.जेष्ठ कवी तथा साहित्यिक कवीवर्य कमलाकर आबा देसले यांनीही शब्दरूपी आशीर्वाद विद्यार्थ्यांना व आम्हाला दिला.तसेच ATF प्रमुख, प्रयोगशील शिक्षक तसेच महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम पुर्नरचना समितीचे सदस्य,मार्गदर्शक भाऊसाहेब चासकर सर, ATM प्रमुख,उपक्रमशील शिक्षक विक्रम अडसूळ सर,तंत्रस्नेही मित्र गजानन उदार सर,तरुणमित्र तुषार शिल्लक,वस्तीशाळेच्या इतिहासात स्वतःचा वेगळा ठसा उमटविणारे तंत्रस्नेही मित्र खंडू मोरे सर इ.सर्वांच्या प्रेरक अभिप्रायातून निश्चितच एक वेगळी दिशा नि आत्मविश्वास वाढण्यास आम्हांस मदत होईल.आपलाही मी ऋणी राहीन.

नाशिक जिल्हा ज्यांच्या प्रेरणेतून कार्य करतोय असे मार्गदर्शक प्राथमिक शिक्षणाधिकारी श्री. प्रविण अहिरे सो.,वेळोवेळी मार्गदर्शन करणाऱ्या सौ.पी.एम.पाटील मैडम विभागीय व्यवसाय मार्गदर्शन अधिकारी नाशिक विभाग,आम्हांला वेळोवेळी सदैव मार्गदर्शन करणारे गटशिक्षणाधिकारी श्री.एस.एस .बच्छाव सो.मालेगाव,श्री.एस.ए.निकम

सो.शिक्षण विस्तार अधिकारी मालेगाव,श्री.प्रमोद चिंचोले सो.शिक्षण विस्तार अधिकारी नाशिक,श्री.के.पी.पगार सो. शिक्षण विस्तार अधिकारी बागलाण,श्री.एन.एम.पवार केंद्रप्रमुख वडनेर,तसेच डिजिटल महाराष्ट्र मिशनचे प्रमुख सदस्य श्री.महेंद्र धिमते केंद्रप्रमुख ठाणे यांच्यासोबत माझे सर्व प्रेरक अधिकारी वर्ग,शिक्षकमित्र,गुरु यांच्याही मी ऋणात राहू इच्छितो..

माझ्या माळीनगरचे सर्व पालक,शाळा व्यवस्थापन समिती माळीनगर,महात्मा फुले सार्वजनिक वाचनालयाचे तरुण मित्र,प्रेरक तंत्रस्नेही,ज्ञानरचनावादी whatsapp group,hike group,fb शैक्षणिक group, ब्लॉगर्स आपणा सर्वांचे मी ऋण व्यक्त करतो.पुनश्चः आपल्या सर्वांचे मनपूर्वक धन्यवाद ...

या चिमुकल्यांच्या काव्यसंग्रहाचे वाचक निश्चितच स्वागत करतील अशी आशा बाळगतो...

- **भरत पाटील**

# प्रस्तावना

## कविता रानफुलांच्या

### ‘एक निरागस आविष्कार‘

आज जिल्हा परिषद प्राथमिक शाळा माळीनगर ता.मालेगाव जि.नाशिक येथील विद्यार्थी मित्रांचा ‘कविता रानफुलांच्या ’हा अनोखा काव्यसंग्रह वाचला.तो ‘अनोखा’ यासाठी आहे,की तो मुद्रित नाही तर संगणकीय आहे.परंतु तरीही या नाविन्यपूर्ण संग्रहातील चिमुकल्या कवी व कवयित्रींच्या सृजनशील आविष्काराने हा संग्रह खरोखर खूप देखणा झाला आहे.यापूर्वी मी पारंपारिकरित्या कवी संजय निकम यांच्या ‘मायमराठी’ या मुद्रित संग्रहाला प्रस्तावना दिली आहे,परंतु एका प्रातिनिधिक कवितासंग्रहाला संगणकीय स्वरुपात प्रस्तावना देण्याची ही पहिलीच वेळ आहे,परंतु तरीही हा अनोखा अनुभव मला अधिक समृद्ध करेल हे नक्की ...

PDF स्वरूपातील या सगळ्या बालमित्रांच्या कविता मी वाचल्या.त्यातील पहिलीच कविता ‘प्रिय पोपट‘ इयत्ता तिसरीच्या निशा रौंदळची आहे.त्यात ती म्हणते -“तो जातो थव्याने,मन ओढतो नव्याने”.एका कविमनाला पोपट आकर्षित करतो,हे तिने सशक्तपणे चितारले आहेच पण कच्चा पेरू हे त्याचे खाद्य आहे.हा अभ्यासातला भागही इथे आलाय.तिच्याच ‘उन्हाळा’ कवितेत अतिशय संवेदनशीलतेने लिहिते.- “उन्हाळ्यात पडला दुष्काळ -

"किती मोठा तो काळ

पाणी शोधता थकला कावळा

सूर्य आता मावळला "

म्हणजेच थेंबभर पाण्यासाठी दिवसा दिवसाची यातना तिने अधोरेखित केली आहे.

काजल रौंदळने "आमचे शेतकरी" कवितेतील पोळ्याचा सण शब्दांमध्ये मांडून संस्कृतीचे दर्शन घडवितांना "माझे वडील","फुलपाखरू" या कविता लिहून सर्जनशीलतेचा एक मापदंड मांडला आहे.रुपालीने 'कबुतर' कवितेतून "संदेशाची चिठ्ठी घेवून जातो कबुतर" असा पूर्वज्ञान जागृतीचा आविष्कार व ज्ञानरचनावादाचा परिचय करून देतांनाच 'शिवराय' व अहिराणी मायबोलीतील 'होळी' लिहून छान कवीमन जपलेय.

'पाऊस'या कवितेतून ईशा मोरेने शेत,तळे,विहिरी या जलस्रोतांचाच परिचय करून दिलाय तर शेळी,साहेब या कवितांमधून दैनंदिन परिचयातील घटकांना छान शब्दरूप दिले आहे.

इयत्ता दुसरीच्या चिमुरड्या दिक्षा जाधवने व ऋतुजा रौंदळने 'दीपावली' कवितेतून मांडलेली मज्जा म्हणजे निरीक्षण शक्तीला सलाम करण्यायोग्य आहे.तिसरीच्या प्रथमेश बागुलने 'पान' व 'ज्ञान' चा छान मेळ जमवलाय.

ऐश्वर्या जाधवने 'रानातला मोर','आनंद'या वेगळ्या कवितांनी संग्रहात मोलाची भर घातली आहे.तर सोनाली बागुलने 'वृक्षारोपण' कवितेतून सरस घोषवाक्ये लिहिलीत. "असेच वृक्ष वाढतील मग,पाऊस त्यांना देतील ढग".हा एक सुंदर नमुना.

"सर्वांपेक्षा वेगळे आमचे शिक्षक" हा हा वैष्णवीने दिलेला पुरस्कारही बहुमोलाचा आहे

याचबरोबर ओमकार बागुल,अनिकेत बागुल,दर्शना भालेराव यांच्या कवितांनी रंगत आणली आहे.सायली मोरेने 'जत्रा' कवितेत मित्राला घरी येण्याचे आग्रही आमंत्रण देतांनाच

इयत्ता दुसरीच्या जागृती जगतापने शाळेतील मित्रांसह रंगपंचमीला आनंद लुटण्याची आस व्यक्त केली आहे.वंदना रौंदळची ‘गिरणा नदी’ ही कविता जशी शब्दप्रवाह अलगद गिरवते तसाच हा बालकविता संग्रहही निरागस प्रवाहाचे सुंदर स्वरूप आहे.

या चिमुकल्या हातांना लिहिते करण्यासाठी अविरत झटणाऱ्या मित्रवर्य भरत पाटील सर,गुरुवर्य राजेंद्र बधान सर यांना शतशः धन्यवाद देवून ‘माय मराठी’ अमरत्वाकडे नेणारे हे चिमुकले हात भविष्यात अधिक समृद्‌ध होवोत,असा शाश्वत आशावाद व्यक्त करून कविता रानफुलांच्या या कविता संग्रहास व लहानग्या चिमुरड्यांना आभाळभर शुभेच्छा देतो.

- संतोष विठ्ठल कांबळे



# अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| साहेब | ईशा मोरे - ४ थी |
| होळी | दर्शना भालेराव -३ री |
| उन्हाळा | निशा रौंदळ - ३ री |
| झाड | काजल रौंदळ - ४ थी |
| होळी (अहिराणी भाषा) | रुपाली रौंदळ - ४ थी |
| जत्रा | सायली मोरे - ३ री |
| जंगल | सोनाली बागुल - ४ थी |

| | |
|---|---|
| पाणी | वैष्णवी रौंदळ - ४ थी |
| गिरणा नदी | वंदना रौंदळ - ४ थी |
| पान | प्रथमेश बागुल - ३ री |
| रंगपंचमी | जागृती जगताप - २ री |
| | |



# प्रिय पोपट



मला आवडतो छान पोपट

त्याचे घर आंब्याच्या झाडावर

तो आहे छान पोपट

त्याला आवडतो कच्चा पेरू

त्याला मी कसे धरू

त्याचे नाव पोपट छान

गुण गातो आम्ही छान

गळ्याभोवती काळा पट्टा

तो करतो थट्टा

तो जातो थव्याने

मन ओढतो नव्याने

**निशा रौंदळ इ.३ री**



# आमचा शेतकरी



शेतात काम करतात शेतकरी
प्राणी मात्रांवर दया करतात शेतकरी

शेतात धान्य पिकवतात शेतकरी
आपली शेती करतात शेतकरी

मला खूप आवडतात शेतकरी
पोळ्याला बैल सजवतात शेतकरी

पाऊस पडल्यावर खूश होतात शेतकरी
कांदे नि भुईमूग लावतात शेतकरी

खूप मेहनत करतात शेतकरी

पेरणी करतात शेतकरी

मुलाबाळांवर प्रेम करतात शेतकरी ...

काजल रौंदळ इ.४ थी



# पोपटा रे पोपटा



पोपटा रे पोपटा तुझा पोपटी रंग
तुला पाहून होतो आम्ही दंग

तुझी आहे निर्मळ वाणी
किती गातोस मंजुळ गाणी

मिठू मिठू आहे तुझा आवाज
कधी कधी तू राहतो नाराज

तुझी घरटी पाहून तू येतो आंब्यावर
हिरवळ शेत पाहून तू येतो शेतावर

तुझी जागा तू दिली कोणाला
गाणी जरा ऐकव जगाला

तू अलग अलग रंगात
सगळ्यांच्या तू बसतो मनात

पोपटा रे पोपटा तू आहे छान
देशाची आहे तू शान

दर्शना भालेराव इ.३ री



# प्रिय बगळा



माझा आवडता बगळा

त्याचा रंग आहे पांढरा

तो हवेत उडतो असा

तो थव्यात बसतो कसा

रानात उडतो जसा

हवेत उडतो कसा

थव्याने जातो

थव्याने येतो



जागृती रौंदळ इ.1 ली संग्रहित



# आवडतो मज कबुतर



आकाशात उंच उडतो कबुतर

झाडावरती बसतो कबुतर

पांढराशुभ्र असतो कबुतर

हिरव्या रानात बसतो कबुतर

संदेशाची चिठ्ठी घेवून जातो कबुतर

पाणी पितो कबुतर

बाजरीचे दाणे खातो कबुतर

मला दंग करतो कबुतर

माझे मन जिंकतो कबुतर

पक्ष्यामध्ये राहतो कबुतर

पावसात भिजतो कबुतर

कबुतर जातो थव्याने येतो थव्याने

मन माझे ओढतो नव्याने

रुपाली रौदळ इ.४ थी



# पाऊस



मला आवडतो खूप पाऊस

पावसाने पीक मोठे होतात

झाडांना पाणी मिळते

माणसे खूप आनंदी राहतात

मुलांना खेळायला खूप आवडते

शेत,तळे,विहीर पावसाने भरून जातात

शेतकरी आनंदित होतात

पावसाने पीक वाढतात

पीक डोलतात

पावसाने जमीन नरम होते

पावसात मुले खूप नाचतात

पावसात मुली फुगडी खेळतात

पावसात सर्व आनंदात राहतात

**ईशा मोरे इ.४ थी**



# ससा



मला खूप आवडतो ससा

पांढराशुभ्र आहे ससा

गवतात लोळतो ससा

शर्यत लावतो ससा

धूम पळतो ससा

माझ्यासोबत बोलतो ससा

कासवाशी शर्यत लावतो ससा

पंधरा रंगाचा असतो ससा

आम्हाला मदत करतो ससा

कान किती छान सशाचे

डोळे किती मस्त सशाचे

ईशा मोरे इ.४ थी





# दिपावली

हार फुले आणतात दिपावालीला

घराला हार लावतात दिपावालीला

कपडे आणतात दिपावालीला

नव्या बांगड्या घालतात दिपावालीला

बहिण भावाला ओवाळते दिपावालीला

फटाके आणतात दिपावालीला

फटाके फोडतात दीपावलीला

चिवडा करतात दिपावालीला

आई बनवते खीर पोळी दिपावालीला

रांगोळ्या आणतात दिपावालीला

रांगोळ्या काढतात दिपावलीला

मामाच्या गावाला जातो दिपावालीला

आकाश कंदील लावतात दिपावालीला

चक्कर लावतात दिपावालीला

रॉकेट उडवतात दिपावालीला

तुळशीजवळ दिवा लावतात दिपावालीला

आनंदी राहतो आम्ही दीपावलीला

दिक्षा जाधव इ .२ री





# दुष्काळ

पाहू न शोककळा दुःखात मन न्हाले

माळीनगरसाठी डोळ्यात अश्रू आले

लोक मरतात दुष्काळात

चांगले असून वाईट बनतात दुष्काळात

मुसळधार पाऊस पडत नाही दुष्काळात

माणसांना पाणी प्यायला मिळत नाही दुष्काळात

गुर ढोर मरतात दुष्काळात

लोकांना दुःखी करतो दुष्काळ

मला आवडत नाही दुष्काळ

सोन्यासारखे माणसे मरतात दुष्काळात

काजल रौंदळ इ.४ थी





# रानातला मोर

पावसात नाचतो मोर

मला आवडतो मोर

पिसारा फुलवितो मोर

सकाळी अंगणात येतो मोर

थुई थुई नाचतो मोर

रंगबेरंगी असतो मोर

झाडावरती बसतो मोर

हिरव्या शेतात येतो मोर

रानात फिरतो मोर

रानातले पाणी पितो मोर

मनापासून आवडतो मला मोर

ऐश्वर्या जाधव इ.४ थी



# आनंद



चला शेतात जाऊ या

आनंदाने काम करू या

शेतात पीक लावू या

चला शेतात फिरू या

आईबरोबर काम करू या

चला जंगलात जाऊ या

चला फुलपाखरू बघू या

चला दिवाळी साजरी करू या

चला शाळेत आपण जावू या

अभ्यास सोबतीने करू या

ऐश्वर्या जाधव इ.४ थी



# वृक्षारोपण



चला शिवारी जावू या
एकेक रोपटे आपण लावू या
खते पाणी देवू या
निगा त्यांची ठेवू या

जोमाने त्यांची होईल वाढ
मोठे होईल हिरवे झाड
खूप खूप झाडे येतील
पशुपक्ष्यांना सावली देतील

असेच वृक्ष वाढतील मग
पाऊस त्यांना देतील ढग
धरणी आपली हिरवी होईल
फुलाफुलांनी बहरून जाईल

सोनाली बागुल इ.४ थी



# गुलाब



माझे आवडते गुलाबाचे फुल

किती सुगंध वास येतो गुलाबाच्या फुलातून

माझी आवडती मैत्रीण घेऊन येते मला गुलाबाचे फुल

सर्वांना आवडते गुलाबाचे फुल

डोक्याला लावतात गुलाबाचे फुल

गुलाबाचा रंग असतो लाल लाल

सरांना फुल देऊ चाल चाल

गुलाबाचे रोप लावतात घरोघरी

गुलाबाच्या फुलाला इंग्रजीतून म्हणतात रोझ

गुलाब पाहून मी करते भोज

छान फुलते गुलाब

डोक्याला लावतात गुलाब

माळ बनवतात गुलाबाची

गुच्छ देतात गुलाबाची

स्वागताला लागतात गुलाब

मला आवडतो गुलाब

ईशा मोरे इ.४ थी



# माझी शाळा



चला शाळेत जाऊ या

आनंदाने अभ्यास करू या

चला वर्ग झाडू या

केरकचरा काढू या

चला शाळेत झाडे लावू या

मजा आपण करू या

चला शाळेत फुलझाडे लावू या

चला गाणीगोष्टी म्हणू या

चला परिपाठ घेवू या

सर्वांना आनंदित करू या

चला शाळेत सावलीत बसू या

पक्ष्यांसंगे गप्पा मारू या

चला चला आपण स्पेलिंग देवू या

दिलेला अभ्यास करू या

चला मैदान स्वच्छ करू या

मैदानात आपण खेळू या

ईशा मोरे इ.४.थी



# दोस्त फुलपाखरू



माझा दोस्त फुलपाखरू

त्याला पाहून सगळे होतात दंग

ते असते रंगबेरंगी

फुले पाहून होतात आनंदी

रस पितात दररोज

पण मला कळत नाही

त्याच्याकडे गेले कि उडून जाते आकाशात

पानाफुलात दिसत नाही फुलपाखरू

कसे उडून जातात फुलपाखरू

सगळे त्याचा फोटो काढतात

माणसांचे मन जिंकून जातात

नाजूक असते फुलपाखरू

मन ओढतात फुलपाखरू

लाल,हिरव्या,पिवळ्या रंगाचे फुलपाखरू

आकाशात भरारी घेते फुलपाखरू

माझा दोस्त फुलपाखरू

त्याला मी कसे विसरू

काजल रौंदळ इ.४.थी





# माझे वडील

शेतात काम करतात माझे वडील

दप्तर घेऊन देतात माझे वडील

शिक्षण करून देतात माझे वडील

गावाला घेऊन जातात माझे वडील

खूप प्रेम करतात माझे वडील

मला खूप आवडतात माझे वडील

खूप कष्ट करतात माझे वडील

प्राणीमात्रांवर प्रेम करतात माझे वडील

शेतात खूप राब राब राबतात माझे वडील

जे मागितले ते घेऊन देतात माझे वडील

पाटी पेन घेऊन देतात माझे वडील

मला चॉकलेट घेऊन देतात माझे वडील

नवे कपडे घेऊन देतात माझे वडील

सगळ्यात वेगळे माझे वडील

मला पैसे देतात माझे वडील

मला खाऊ देतात माझे वडील

बाजारात घेऊन जातात माझे वडील

आईस्क्रीम घेवून देतात माझे वडील

खूप जीव लावतात माझे वडील

काळ्या मातीचा सेवक माझे वडील

मला दवाखान्यात घेऊन जातात माझे वडील

शेतात पीक लावतात माझे वडील

फळे आणतात माझे वडील

मला दुकानात घेऊन जातात माझे वडील

**डबा घेऊन जातात माझे वडील**

**मला बांगड्या घेऊन देतात माझे वडील**

**वही पेन घेऊन देतात माझे वडील**

**मला पुस्तक घेऊन देतात माझे वडील**

**मला खूप खूप आवडतात माझे वडील**

काजल रौंदळ इ.४.थी



# आमचे शिक्षक



मला आवडतात आमचे शिक्षक

अभ्यास देतात आमचे शिक्षक

वाचायला देतात आमचे शिक्षक

लिहायला देतात आमचे शिक्षक

मला खूप आवडतात आमचे शिक्षक

टॅबवर शिकवतात आमचे शिक्षक

कम्प्युटरचे ज्ञान देतात आमचे शिक्षक

सगळ्यांना हुशार करतात आमचे शिक्षक

व्यायाम घेतात आमचे शिक्षक

खूप जीव लावतात आमचे शिक्षक

कविता गाणे तयार करायला लावतात आमचे शिक्षक

वाचनालयाकडे घेऊन जातात आमचे शिक्षक

सर्वांपेक्षा वेगळे आमचे शिक्षक

वैष्णवी रौंदळ इ.४.थी



# दिवाळी



दिवाळी माझी आवडती आहे

मला खूप खूप आवडते दिवाळी

मी गावाला जाते दिवाळीला

हार बांगड्या घेऊन देतात दिवाळीला

वडील कपडे घेऊन देतात दिवाळीला

मजा करता येते दिवाळीला

मामाच्या गावाला जाते मी दिवाळीला

आमच्या घरच्यांना आनंद होतो दिवाळीला



ऋतुजा रौंदळ इ.२.री



# शेळी



मला आवडते शेळी

ती खूप काळी

ती दिसते छान

किती सुंदर रान

रानात होता मोर

किती खाल्ले बोर

बोरात होती आठोळी

किती सुंदर रांगोळी

रांगोळीत भरला रंग

मी लिहिला अभंग

मला आवडते शेळी

चारा द्यावा वेळोवेळी

शेळी मला आवडते

ती मला दूध देते

तिचे मस्त कान

ठेवू तिचा मान

ईशा मोरे इ.४.थी





# बाळा

बाळा तू आहे भोळा

शिकूया आपण शाळा

हिरवा आहे मळा

साहेबांना आमचा लळा

झाडावर बसला कावळा

शाळेच्यापुढे लावला आवळा

शाळेच्यासमोर खेळा

रंग घ्या निळा

बाळा तू काळा

सर्वांना लावतो लळा

कपडा घेतला पिवळा

ईशाने खाल्ला आवळा

गाजराचा आहे मळा

मी लिहिते फळा

फळा आहे काळा

शिकून मोठा हो बाळा

काजल रौंदळ इ.४.थी



# शिवराय



शिवरायांचे आठवावे रूप

शिवरायांचा आठवावा प्रताप

शिवराय खूप मोठे झाले

वडाचे झाड छोटे झाले

दरबारात आले मावळे

झाडावरती बसले कावळे

शिवराय बसले सिंहासनावर

मावळे बसले घोड्यावर

जिजाऊचा पुत्र शिवाजी

वडील नाव शहाजी

हातात घेतल्या तलवारी
मावळे जाती रणावरी

शिवाजींचा मोठा विश्वास
मावळ्यांचा तोच श्वास

शिवाजी आले दरबारात
मावळे गेले प्रकाशात

रुपाली रौंदळ इ.४.थी



# माय



माय आहे छान

आम्ही देतो मान

माय आहे छान

आम्हाला दिसते पान

माय आहे छान

आम्ही आहोत लहान

माय आहे छान

एक आहे मान

ती आहे दुधाची साय

साऱ्या जगाची माय

ओमकार बागुल इ.४.थी



# शेत



शेतात आम्ही पीक पिकवितो

पिकांना आम्ही पाणी घालतो

शेतात आम्ही कांदे लावतो

कादयांना आम्ही फवारणी करतो

माणसे शेतात घर बांधतात

शेतात मुले कुस्त्या खेळतात

बैलाकडून आम्ही शेत नांगरतो

त्याच्यावरून परत फळी मारतो

शेत आहे खूप छान

सुंदर दिसते माझे रान

शेतात आम्ही फिरतो

मी गाणे गातो

शेतात आम्ही भाजी लावतो

आम्ही भाजीपाला मस्त तोडतो

शेतात जातात मुल

ते तोडतात फुल

खूप आवडते मला शेत

तोच असतो माझा बेत

अनिकेत बागुल इ.४.थी



# साहेब

साहेब आले शाळेत

फुले आहेत माळेत

साहेबांनी सांगितले वाचायला

आम्ही गेलो शाळेला

शाळेत आहेत साहेब

सर्वांना आवडतात साहेब

स्वागत करायचं साहेबांच

मन लावून शिकायचं

साहेबांनी सांगितले खेळायला

मुलं गेले धावायला

स्वागत करायचे साहेबांचे

नाव गाजवायचे माळीनगरचे

ईशा मोरे इ.४.थी



# होळी



होळी आहे छान

करू नका घाण

सुंदर आहे होळी

आम्ही खाल्ली गोळी

आईने केली पोळी

मी खाल्ली पोळी

होळीच्या दिवसी केली पोळी

सर्वांना आवडते पोळी

दर्शना भालेराव इ.३.री



# उन्हाळा



आला आला उन्हाळा

आम्ही गेलो पन्हाळा

पन्हाळ्यात पडला पाऊस

आम्ही केली हौस

उन्हाळ्यात पडला दुष्काळ

किती मोठा तो काळ

पाणी शोधता थकला कावळा

सूर्य आता मावळला

फळ उगवत नाही मातीत

उन्हाळा कोणत्या नातीत

निशा रौंदळ इ.३.री



# झाड



झाड आपण लावूया

फळ,फुले,सावली घेवूया

झाडांना पाणी टाकूया

झाडांना खत देवूया

झाडांपासून सावली घेवूया

सावलीत आपण खेळूया

झाडांना खत देवूया

झाडांना पाणी टाकूया

झाडांविषयी माहिति लिहू या

झाडांची माहिती मिळवूया

झाडांवर आपण चढूया

मजाच मजा आपण करू या



काजल रौंदळ इ.४.थी



# होळी (अहिराणी भाषा)



सकाळ शे होळी

माले आवडस पोळी

माले आवडस नही कोळी

दुकान मा राहस गोळी

पोरसले आवडस पोळी

पण ती से काळी

आम्ही सेतस माळी

ती शे थाळी

आम्हले आवडस होळी

त्या खातस पोळी

होळीमा व्हस जाळ

आते शे ना दुष्काळ

होळी मा टाकतस गौऱ्या

उन्हाळामा येतीस भवऱ्या

होळी करा साजरा

पाणी जपी वापरा

रुपाली रौंदळ इ.४.थी



# जत्रा



आली आली जत्रा

तो पहा कुत्रा

जत्रेला आपण जाऊया

खूप गोष्टी पाहूया

जत्रेला केली मजा

मुलीचे नाव पूजा

पूजा आहे मुलीचे नाव

मुलांनी पाहिले सुंदर गाव

येशील माझ्या घरा

मित्र जीवाचा खरा

आईने जत्रेला पाठवलं

लहानपण मला आठवलं

आई जत्रेला घेऊन गेली

जत्रेला मी चप्पल घेतली

जत्रेला गेली गाडीवर

कावळा होता माडीवर

जत्रा खूप छान

मला आवडत नाही घाण

सायली मोरे इ.३.री



# जंगल



जंगलात होते पाणी

मी गाते गाणी

जंगल आहे छान

किती सुंदर रान

जंगलात कोणी जाऊ नका

झाडे कोणी तोडू नका

जंगलात आहेत झाड

माझे होतात लाड

ते आहे जंगल

कोणाचे नाव मंगल

जंगलात आहेत फुले

शाळेत जातात मुले

जंगल आहे दाट

कोणी दिले ताट

सोनाली बागुल इ.४.थी



# पाणी



पडतो खूप पाणी

मी पाहिली राणी

गाऊ आपण गाणी

दुरून पडतो पाणी

पाण्याचा करा साठा

होणार नाही तोटा

पाणी लागतं झाडाला

वेळ लागतो तोडायला

पाणी सगळे वाचवा

जीवन आपले मिळवा

पाणी माठात भरा

कष्ट आपण करा

जंगलात असतं पाणी

चला गाऊया गाणी

वैष्णवी रौंदळ इ.४.थी



# गिरणा नदी



खूप छान आहे गिरणा नदी

मला खूप आवडते गिरणा नदी

ती देते मला पाणी

मला आहे गरज पाण्याची

आपल्याला गरज आहे पाण्याची

पाणी हे आपलं जीवन आहे

आपल्याला पाण्याचीच गरज आहे

आपल्याला पाणी नाही आहे

ते आपण वाचवायचं आहे

लोक गिरणा नदीवरून पाणी आणतात

गिरणा नदीवरून पाणी आणून लोक जगतात

वंदना रौंदळ इ.४.थी



# पान



झाडाला येतात पान

आम्हाला आवडतो कान

पान आहे छान

आम्ही गेतो ज्ञान

झाडाला येतात पान

सायकल घेतली छान

झाडाला येतात पान

शाळा दिसते छान

हिरवे आहे पान

झेंडा दिसतो छान

झाडाला आहे पान

सर देतात ज्ञान

प्रथमेश बागुल इ.३.री



# रंगपंचमी



रंग आपण खेळू

मजा आपण करू

रंगपंचमीला आपण जाऊ

रंग आपण घेऊ

रंग आपण खेळू

एकत्र आपण खेळू

मजा करू रंगपंचमीला

शाळेत जाऊ रंगायला

जागृती जगताप इ.२.री

दोस्तहो,

खरं तर माझ्या रानफुलांचा सुंगध कवितेच्या रूपातून आपणापर्यंत पोहोचला याचा आनंद तर आहेच पण काही प्रेरणादायी व्यक्तिमत्वांनी पाठविलेल्या कवितासंग्रहाविषयीच्या प्रतिक्रिया या ठिकाणी आवर्जून देत आहे. आपल्याला हा विद्यार्थ्यांचा कवितासंग्रह कसा वाटला ते कळवा.शेवटी प्रेरणा देणे नि घेणे हा व्यक्तीमत्वाचाच एक भाग समजतो.....

मो.नं. **whatsapp/hike - 8421794981**

**E mail- bharatpatil798@gmail.com**

## * प्रेरक अभिप्राय *

** आपल्या शाळेतील चिमुरड्यांनी लिहिलेल्या कविता वाचल्यात .पहिली ते चौथीच्या मुलांकडून जे आपण करून घेत आहात त्या गोष्टीचे कौतुक वाटते.ज्ञानरचनावाद विद्यार्थ्याला क्रियाशील करतोच पण सर्जनशीलही करतो.विद्यार्थ्यांच्या कवितेतून जाणवले,की मुक्त निर्भय वातावरणात मुलांच्या विचारशक्तीला धुमारे फुटतात.

इतक्या लहान वयात यमकाचे भान विद्यार्थ्यांना आहे कौतुकास्पदच..स्वतःच्या विचारातूनच आचाराची बांधिलकी आणि कर्मात सामिलकी निर्माण होते.

हि मुले मुले उद्या त्यांच्याच कवितेतील विचाराचे पाईक होतील.तुमच्यातील उपक्रमशील शिक्षकाचे अभिनंदन..

आपल्या सर्व प्रयत्नांना शुभेच्छा..

- श्री.कमलाकर आबा देसले (लेखक,कवी तथा साहित्यिक नाशिक)

** प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र घडवितांना प्रत्येक विदयार्थी शिकला पाहिजे,तंत्रज्ञान व ज्ञानरचनावाद यांचा योग्य उपयोग करीत ह्या बाबी शक्य आहेत,असा विश्वास आज अनेक शाळांच्या डिजिटल व ज्ञानरचनावादी प्रगतीकडे पाहून वाटतो.

ज्ञानरचनावाद व तंत्रज्ञानाचा योग्य मिलाप साधत जि.प.शाळा माळीनगरच्या विद्यार्थ्यांचा "कविता रानफुलांचा" प्रकाशित होणे कौतुकास्पदच...आपली भावाभावंना चिमुकल्यांनी छान पद्धतीने कागदावर रेखाटल्या आहेत.शाळेच्या शैक्षणिक प्रगतीस मनस्वी शुभेच्छा...!

श्री.प्रवीण अहिरे सो.(प्राथमिक शिक्षणाधिकारी नाशिक )

** 'कविता रानफुलांच्या' कवितासंग्रह वाचून आनंद झाला,कारण या विद्यार्थ्यांची निरीक्षण क्षमता,पक्ष्यांचे हुबेहूब वर्णन,आजुबाजूला असलेली परिस्थितीची जाणीव..... काजल,रुपाली,ओम,ईशा,निशा,दर्शना,दिक्षा व इतर सर्व विद्यार्थ्यांच्या कविता साध्या सरळ पण तितक्याच संवेदनशील विचार करावयास लावतात.दुष्काळ,शेत,पाणी,होळी,रंगपंचमी,ससा,कबुतर,वडील इ.अनेक विषय घेत कविता लिहित अभिव्यक्त होणे कौतुकास्पदच...

कवितासंग्रह आवडला...उपक्रमशील शिक्षक भरत पाटील व लहानग्या कविमित्रांना पुढील वाटचालीस शुभेच्छा.....

श्रीमती.पी.एम.पाटील (विभागीय व्यावसायिक मार्गदर्शन अधिकारी,नाशिक विभाग)

** माळीनगर शाळेची तंत्रस्नेही ज्ञानरचनावाद पद्धतीची वाटचाल कौतुकास्पदच..विद्यार्थ्यांनी स्वयं अध्ययन करत स्व भावना कवितेच्या रुपात मांडल्या आहेत...बधान सर व भरत पाटील यांच्या प्रेरक मार्गदर्शनाने विद्यार्थी तंत्रज्ञान व रचनात्मक पद्धतीने शिकत आहेत.

दोघं शिक्षकांच्या उत्साहवर्धक कामकाजामुळे शाळेच्या विकासाबरोबर गावाचा विकासात्मक आलेख उंचावत असून गाव एकसंघ झाले आहे..याचे समाधान वाटते...शाळेच्या प्रगतीस शुभेच्छा..

- श्री.एस.एस.बच्छाव सो.(गटशिक्षणाधिकारी पं.स.मालेगाव )

** एक स्तुत्य उपक्रम...

मुलांच्या भावविश्वाला प्रकट होण्याची संधी निर्माण करून देणे हेच खरे शिक्षण ..मुलांची संवेदनशीलता जपणारे आपल्यासारखे गुरु त्यामुळेच पूजनीय ठरतात.

सर्व रानफुलांचे कौतुक व त्यांना संधी देणाऱ्या माळीनगर शाळेचे अभिनंदनिय कार्य ..तुमच्या वाटचालीस मनपूर्वक शुभेच्छा ..

- श्री.प्रमोद चिंचोले सो. (शिक्षण विस्तार अधिकारी नाशिक)

** ज्ञानरचनावाद तत्वावर आधारित व तंत्रज्ञानाचा योग्य समन्वय साधत, बालस्नेही वातावरण निर्माण करून विद्यार्थ्यांना स्वतःच्या गतीने स्वतःचा विकास करण्याची सुवर्णसंधी माळीनगर येथील शिक्षकांनी उपलब्ध करून दिलीत.विद्यार्थ्यांनी कविता रचत तो प्रकाशित करण्याचा मानस हा शाळेच्या व तालुक्याच्या शिरपेचात मानाचा तुरा खोवला याचा अभिमान वाटतो.शाळेच्या भावी वाटचालीस शुभेच्छा.

- श्री.एस.ए.निकम सो. (शिक्षण विस्तार अधिकारी मालेगाव)

**** खूपच छान काव्यरचना ..दुष्काळ,शेतकरी,पोपटा रे पोपटा विद्यार्थ्यांच्या अनुभव विश्वाची प्रगल्भता दर्शवितात.विद्यार्थ्यांचे भावविश्व फुलविणाऱ्या शिक्षकांचेही अभिनंदन.**

**रचनाकार रानफुलांना शुभेच्छा ..**

**- श्री.के.पी.पगार सो.( शिक्षण विस्तार अधिकारी बागलाण)**

** कविता रानफुलांच्या वाचतांना अलगद बालपण आठवते.विद्यार्थ्यांच्या भावविश्वाला समृद्ध करणारा कवितासंग्रह बालप्रतिभेसाठी मोठे व्यासपीठ ठरलाय.आजवर अभिव्यक्ती कौशल्य जन्मजात गुणांवर अवलंबून राहिले,रचनावादाने मात्र अभिव्यक्तीची नवी कवडे खुली करून दिलीत.

पक्षी,प्राणी,निसर्ग,शाळा आणि व्यक्तिविशेष अशा सर्व पैलूंना काव्यसंग्रहात स्थान मिळाले आहे.विद्यार्थ्यांना अल्पवयात साहित्याच्या कविता या अंगाचा परिचय होणे खूप मोठी उपलब्धी आहे.रानफुलांनो मनस्वी शुभेच्छा.

श्री.गजानन उदार (कवी तथा प्रा.शिक्षक आडगाव)

** माऊली,आपण करीत असलेले प्रयोग हे सर्व शिक्षकांसाठी पथदर्शक आहेत.डिजिटल क्षेत्रात ज्ञानरचनावादला काय वाव? असा प्रश्न विचारणाऱ्यांना आपले नव नवीन प्रयोग योग्य उत्तर समजतो.डिजिटल वाचनालय,डिजिटल साहित्य,डिजिटल स्वनिर्मित कविता,बोलक्या कविता हे तंत्रस्नेही रचनावादच की ..असो तुमच्या तंत्रस्नेही रानपाखारांना शुभेच्छा...

- श्री.महेंद्र धिमते सो. (MDS केंद्रप्रमुख ठाणे)

** शिक्षणातील नवे प्रवाह समजून घेवून प्रयोग करत असलेले अनेक प्रयोगशील शिक्षक मुलांच्या शिकण्याच्या अंगाने भाषा शिक्षणाचा मुळातून विचार करीत आह्ेत.मुलांना त्यांच्या भाषेत व्यक्त होण्याचे स्वातंत्र्य देत आहेत.भाषेच्या अंगणात मुक्तपणे व्यक्त होतांना अनेक ठिकाणची मुलं शब्दांशी मस्तपैकी खेळू लागली आहेत.धड्यांखालील प्रश्नोत्तरांच्या पुढे जाऊन मुलांना शिकवणारे विचारी शिक्षक जिथे मिळाले त्या मुलांचा भाषिक विकास उत्तम झाल्याचे माझे निरीक्षण आहे.

भरत पाटील या हरहुन्नरी,उपक्रमशील शिक्षकाच्या संकल्पनेतून “कविता रानफुलांच्या” हा तिथल्या जिल्हा परिषदेच्या शाळेतल्या चिमुकल्यांचा कविता संग्रह प्रकाशित होतोय याचा मनोमन आंनद आहे.लहानग्यांच्या भावविश्वातील गोष्टींविषयी मुलांना काहीतरी म्हणायचे असते,लिहायचे असते,व्यक्त व्हायचे असते.ती संधी,तो अवकाश अशा गोष्टींतून मुलांना मिळते,म्हणून अशा उपक्रमांच शैक्षणिक मूल्य फार मोठे आहे.ख्यातनाम शिक्षणतज्ञ कृष्णकुमार म्हणतात की,'बालसाहित्य म्हणजे केवळ मोठ्यांनी लहानांसाठी लिहिलेले साहित्य नव्हे! लहान मुलांनी लिहिलेल्या कथा,कविता,निबंध हेदेखील अस्सल दर्जाचे बालसाहित्यच असते ! पाठ्यपुस्तकांमध्ये मुलांच्या साहित्याचा समावेश करायचा अत्यंत स्तुत्य असा निर्णय राज्याने घेतलाय त्यातून निश्चितच मुलांना लिहायला आणखीन प्रोत्साहन मिळेल.त्यासाठी शाळाशाळांतील मुलांना आधी लिहिते केले पाहिजे.ज्यायोगे मुलांचे व्यक्तिमत्व आणि भाषा अधिकाधिक

समृद्ध होत जाईल.म्हणूनच भरत पाटील यांच्या या उपक्रमाचे स्वागत करतांना याचा 'संसर्ग' राज्यभर होवो अशा सदिच्छा!

- श्री.भाऊसाहेब चासकर

प्रयोगशील शिक्षक ,शिक्षण क्षेत्राचे अभ्यासक आणि महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम पुर्नरचना समितीचे (मराठी)सदस्य

** सुजाण,सुसंस्कृत,स्वावलंबी,राष्ट्राभिमानी नागरिक शाळा शाळातून निर्माण व्हावा ह्या हेतूने प्रेरित होवून विद्यार्थ्यांना निसर्गाच्या सानिध्यात नेऊन निसर्गाशी हितगुज करणाऱ्या 'कविता रानफुलांच्या' हा कवितासंग्रह हा विद्यार्थ्यांच्या मनात आत्मविश्वास निर्माण करणारा आहे.लहान वयात निसर्गाचे सुख दुःख,भावभावनांचे विश्व कागदावर उतरविणाऱ्या विद्यार्थ्यांचे व त्यांना मार्गदर्शन करणाऱ्या शिक्षकांचे अभिनंदन ....

- श्री.एन.एम.पवार सो.(केंद्रप्रमुख वडनेर,मालेगाव)

** ज्या वयात बडबड गीत आळवयाची त्या वयात इतक्या गोड कविता ह्या चिमुकल्याना सुचतात ह्याचंविशेष कौतुक वाटते.पक्षी,शाळा,शेतकरी ह्या त्यांच्याच बालपणातल्या विषयावर ह्या चिमुरड्यांनी भाष्य केल आहे तेही कवितेच्या स्वरुपात ....आजचे हे बालकवी उद्याचे भावी साहित्यिक होणार हे निश्चित ..त्यांच्या भावी वाटचालीस खूप गोड शुभेच्छा.

- श्री.तुषार शिल्लक (शिवव्याख्याते तथा युवा कवी मालेगाव)

** विदयार्थांच्या दप्तरात त्यांच्या स्वरचित कविताही असतात हे माळीनगर च्या विद्यार्थ्यांनी दाखवून दिले आहे.डिजिटल स्वरूपातल्या कविता येणे नि मुलींच्या विशेष जास्तीच्या कविता विचार करण्यास भाग पाडतात.कथा कवितांचे मळे ज्ञानरचनावाद पद्धतीने फुलविण्याचे कार्य प्रेरणादायीच ..आपण केलेल्या कविता मुलांना बरच काही शिकवून जाणार आहे. मुलांची अभिव्यक्ती फुलविण्याचे नि कवितासंग्रह प्रकाशित कार्यास मनस्वी शुभेच्छा....

- श्री.खंडू मोरे (तंत्रस्नेही प्राथमिक शिक्षक बागलाण)

** जेथे मन निर्भर असेल आणि मस्तक उन्नत असेल तेथे ज्ञान विमुक्त होते व तेथूनच साहित्य सरितेचा उगम होतो.चिमुकल्यांना त्यांच्या मायबोलीत व्यक्त होतांना त्यांचे व्यक्तिमत्व घडत जाते.त्यांची भाषाही समृद्ध होत जाते.

माळीनगर शाळेच्या चिमुकल्यांचा 'कविता रानफुलांच्या' हा कवितासंग्रह प्रकाशित होतोय.श्री.भरत पाटील व त्यांचे सहकारी श्री.बधान यांच्या अशा उपक्रमांमुळे शिक्षक व समाजाला काळाबरोबर धावण्याची उर्मी मिळते आहे.

या कवितासंग्रहाची लागण सर्वदूर होवो हि मनस्वी मनोकामना...!

ह.भ.प.श्री.पृथ्वीबाबा शिरसाठ (अध्यक्ष,विश्व वारकरी सेना मालेगाव )